**मुंबई उपनगर जिल्ह्यातील शासकीय जमिनींन संदर्भात मा. मुंबई उच्च न्यायालय तसेच मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल असलेल्या व मोठ्या प्रमाणावर शासनाचा महसूल अडकलेल्या न्यायालयीन प्रकरणांमध्ये विधी व न्याय विभागाच्या सहमतीने शासनाच्या वतीने बाजू मांडण्यासाठी नियुक्त केलेल्या विशेष विधीज्ञांच्या प्रलंबित देयकांची प्रतिपुर्ती करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : जमीन-२६१९/प्र.क्र.०४/ज-३**

मंत्रालय, मख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०२२.

वाचा : १) विधी व न्याय विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक-११९९३/संकीर्ण/ई, दिनांक १८/०७/२०१४.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दिनांक २९/०७/२०१५.
३) विधी व न्याय विभाग, शासन परिपत्रक क्र.समुप-२०२१/प्र.क्र.२२३/का.१४, दि.०६/१०/२०२१.

प्रस्तावना :-

मुंबई उपनगर जिल्ह्यातील शासकीय जमिनीसंदर्भात मा. मुंबई उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल असलेल्या व शासनाचा मोठ्या प्रमाणावर महसूल अडकलेल्या न्यायालयीन प्रकरणांमध्ये शासनाच्या वतीने मा. न्यायालयात बाजू मांडण्यासाठी विधी व न्याय विभागाच्या सहमतीने "विशेष विधीज्ञाची" नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार ज्या -ज्या न्यायालयीन प्रकरणी वरिष्ठ विधीज्ञांची नियुक्ती करण्यात आली आहे, त्या-त्या न्यायालयीन प्रकरणात संबंधित वरिष्ठ विधीज्ञांनी सुनावणीनुषंगाने विभागाच्या अधिकाऱ्यांसमवेत चर्चासभा घेऊन सुनावणीच्या तारखांना मा. न्यायालयात शासनाची बाजू मांडली आहे. त्यानुषंगाने संबंधित "विशेष विधीज्ञांनी" त्यांच्या व्यावसायिक सेवा शुल्काची देयके प्रदान करण्याची विनंती शासनास संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झाली आहेत.

०२. विधी व न्याय विभागाने संदर्भाधीन क्र.३ येथील शासन परिपत्रकान्वये, महत्वाच्या न्यायालयीन प्रकरणी शासनाच्यावतीने बाजू मांडण्यासाठी शासनाच्या पॅनेलवर विशेष समुपदेशी/ विधीज्ञ यांची सेवा उपलब्ध नसल्याने, “शासनाच्यावतीने न्यायालयीन प्रकरणात काम पाहण्यासाठी विशेष समुपदेशी (Special Counsel/ Senior Counsel) यांची नियुक्ती केली जाते. त्यामुळे संबंधित विभागाच्या अर्थसंकल्पीत तरतूदीमधून अशा विशिष्ट प्रकरणात नेमलेल्या विधीज्ञांचे मानधन अदा करावे लागते. परंतु अशा काही विधीज्ञांचे मानधन प्रलंबित असल्याची बाब निदर्शनास आली असल्याने, विभागामधील प्रकरणात नेमलेल्या विशेष समुपदेशींची देयके सत्वर अदा करावीत.” अशा सूचना सर्व विभागांना दिल्या आहेत. संबंधित विशेष विधीज्ञांची विनंती तसेच विधी व न्याय विभागाच्या संदर्भाधीन शासन परिपत्रकातील सूचना विचारात घेऊन, त्यानुषंगाने वित्त विभागास केलेल्या विनंतीनुसार वित्त विभागाने सन २०२१-२२ या वर्षाच्या सुधारित अंदाजामध्ये लेखाशीर्ष २०५२ ०२१२ मधील “०१ वेतन” या उद्दीष्टाखालील बचतीमधून, लेखाशीर्ष २०५२ ०२१२ मधील “२८ व्यावसायीक सेवा” या उद्दीष्टाखाली तरतूद उपलब्ध करुन दिली असून बीम्स प्रणालीवर सदर तरतूद उपलब्ध झालेली आहे.

**०३.** सबब, वित्त विभागाने सन २०२१-२२ या वर्षाच्या सुधारित अंदाजाव्दारे लेखाशीर्ष २०५२ ०२१२ मधील "२८ व्यावसायीक सेवा" या उद्दीष्टाखाली उपलब्ध करुन दिलेली रु.९५.४७ लक्ष इतक्या रक्कमेची तरतूद मुंबई उपनगर जिल्ह्यातील जमिनी संदर्भात मा. मुंबई उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथील दाखल न्यायालयीन प्रकरणी शासनाची बाजू मांडण्यासाठी विधी व न्याय विभागाच्या सहमतीने नियुक्त केलेल्या विशेष विधीज्ञांनी मा. न्यायालयात सुनावणी वेळी शासनाची बाजू मांडली असल्याने, त्यानुषंगाने त्यांनी शासनास सादर केलेल्या व्यावसायिक सेवा शुल्काच्या देयकांची प्रतिपूर्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

मुंबई उपनगर जिल्ह्यातील शासकीय जमिनीसंदर्भात मा. मुंबई उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालय येथे दाखल न्यायालयीन प्रकरणांमध्ये शासनाची बाजू मांडण्यासाठी विधी व न्याय विभागाच्या सहमतीने नियुक्त केलेल्या विशेष विधीज्ञांनी मा. मुंबई उच्च न्यायालय / मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल प्रकरणांमध्ये शासनाची बाजू मांडल्या प्रकरणी खाली नमूद केल्याप्रमाणे संबंधित विधीज्ञांना व्यावसायिक सेवा शुल्काच्या देयकांची प्रतिपूर्ती करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे. :-

| **अ. क्र.** | **वरिष्ठ विधीज्ञाचे नाव** | **याचिका क्रमांक** | **व्यावसायिक सेवा शुल्काची अदा करावयाची रक्कम (रु.)** |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ६ |
| १ | ॲड. श्री. ई.पी.भरुचा | याचिका क्र. १०२९/१९९८<br>महाराष्ट्र शासन ***विरुध्द*** इंडीया फारमर्स लि.<br>(मा. मुंबई उच्च न्यायालय) | १८,५०,०००/- |
| २ | ॲड.श्री.अनिल साखरे | सुट नं.६७९/ १९७३<br>महाराष्ट्र शासन ***विरुध्द*** गोदरेज ॲण्ड बॉयज मॅन्युफॅक्चर्स लि. व इतर<br>(मा. मुंबई उच्च न्यायालय) | ८,३०,०००/- |
| ३ | ॲड.श्री.श्रीहरी अणे | याचिका क्र. ५७९२/ २०१५ श्रीम.गोदावरी सुमेरमल बाफना ***विरुध्द*** महाराष्ट्र शासन<br>(मा. मुंबई उच्च न्यायालय) | १७,३०,०००/- |
| ४ | ॲड. श्री.आत्माराम एन. एस. नाडकर्णी | एसएलपी (सी) क्र.११३२८/ २०१४<br>महाराष्ट्र शासन ***विरुध्द*** शांताबाई केरकर<br>(मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली) | २,२०,०००/- |
| ५ | ॲड. श्री. जनक व्दारकादास | नो.ऑ.मो.क्र.३६७८/२०११- सुट क्र. २०३३/ १९८२<br>देवीबाई पावसा चिंचेचा ***विरुध्द*** महाराष्ट्र शासन<br>(मा. मुंबई उच्च न्यायालय) | ४९,१७,०००/- |
| | | **एकूण देय रक्कम रुपये** | **९५,४७,०००/-** |

**०२.** याकामी वित्त विभागाने सन २०२१-२२ च्या सुधारित अंदाजाव्दारे विभागाच्या मागणी क्र.C-४/ २०५२-सचिवालय-सर्वसाधारण सेवा (२०५२०२१२) (००) (०१) महसूल व वन विभाग (अनिवार्य) २८, व्यावसायिक सेवा" या लेखाशीर्षाखाली तरतूद उपलब्ध करुन दिलेली आहे. या तरतूदीमधून सदरचा खर्च भागविण्यात यावा. तसेच उपलब्ध तरतूद दिनांक ३१/०३/२०२२ पर्यंत खर्ची करणे आवश्यक असल्याने, विवरणपत्रातील स्तंभ क्र.२ मध्ये नमूद संबंधित विधीज्ञाच्या नावाने स्तंभ क्र.६ मध्ये दर्शविलेली व्यावसायिक सेवा शुल्काची अदा करावयाची देयकाची रक्कम संबंधित विधीज्ञांना विहित कालमर्यादेत अदा होईल याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी घ्यावी.

**०३.** सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने (अनौचारीक संदर्भ क्र.६८/२०२२/व्यय-०९, दिनांक २१/०२/२०२२) व वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/ प्र.क्र.२१/ २०१५/ विनियम, दिनांक २९/०७/२०१८ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला उप विभाग-दोन मधील अ.क्र.४९, नियम क्र.१६६-अ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच विधी व न्याय विभाग, शासन शुध्दीपत्रक क्रमांक-११९९३/संकीर्ण/ई, दिनांक १८/०७/२०१४ मधील १) (ब) नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०४.** सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२२०३२९१२०७५६८२१९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

RAMESH SHIVAJI CHAVAN

Digitally signed by RAMESH SHIVAJI CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7ada4e8fa11566f3b9c9f7b5fa123945d54f8e3d5b09d05bedfa09b97ee45cad, pseudonym=8681E76138CFE5A3E889AB0B442F95DD2288C273, serialNumber=EB458B05E05EE27F435BD399537405D44E1C88021CF038B060AC10B9D8FB8787, cn=RAMESH SHIVAJI CHAVAN
Date: 2022.03.29 12:08:44 +05'30'

**( रमेश चव्हाण )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

१. सरकारी वकील, सरकारी वकील यांच कार्यालय (मुळ शाखा), मा. उच्च न्यायालय, मुंबई.
२. महालेखाकार, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. सह सचिव (व्यय-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सह सचिव (विधी), विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सह सचिव (रोख शाखा), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी (रोख शाखा), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. ॲड. श्रीहरी अणे, १२ए, सागर संगित, एस.बी.एस. रोड, कुलाबा, मुंबई-४०० ००५.
९. ॲड. श्री. जनक व्दारकादास, पत्ता- मुल्ला हाऊस, तिसरा मजला, ५१ महात्मा गांधी रोड, मंबई-००१.
१०. ॲड. श्री.अनिल साखरे, पत्ता-२०, मेडोज हाऊस, ४था मजला, अंकुर हॉटेलच्या वर, ३९, नागिनदास मास्टर रोड, फोर्ट, मुंबई-४०० ०२३.
११. ॲड. श्री. ई.पी.भरुचा, पत्ता-चेंबर्स २०१, सावला चेंबर्स, ४० कावासजी पटेल रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
१२. ॲड. श्री. आत्माराम एन. एस. नाडकर्णी, सरकारी वकील, पत्ता महाराष्ट्र सदन, कस्तुरबा गांधी मार्ग, नवी दिल्ली-०१.
१३. निवड नस्ती (कार्यासन ज-३)